**महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या कार्याचे पुर्नविलोकन करण्यासाठी अभ्यासगट गठीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मकृप १०२२/प्र. क्र.२६४/७-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २५ एप्रिल २०२३

संदर्भ : मा.मंत्री (कृषि) यांचे दि.३०.११.२०२२ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यात महात्मा फुले कृषि विद्यापीठ राहुरी, जि.अहमदनगर, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ अकोला, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ परभणी व डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ दापोली, जि. रत्नागिरी ही चार कृषि विद्यापीठे कार्यरत आहे. सदर कृषि विद्यापीठांचे प्रमुख उद्दिष्ट कृषि क्षेत्रात संशोधन, शिक्षण व विस्तार हे आहे.

महाराष्ट्रातील कृषि विद्यापीठांमध्ये प्रभावी समन्वय व सुसूत्रता साधण्यासाठी महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ अन्वये नियम क्र.१२ नुसार दि.१० सप्टेंबर, १९८४ रोजी महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेची स्थापना करण्यात आली आहे. कृषि परिषदेचे मुख्यालय पुणे येथे आहे. राज्याचे कृषि मंत्री हे परिषदेचे पदसिध्द अध्यक्ष असतात.

चारही कृषि विद्यापीठातील प्राध्यापक, विभागप्रमुख, सहयोगी अधिष्ठाता, अधिष्ठाता आणि संचालक सवंर्गातील पदावर नियुक्तीसाठी सन २०१३ मध्ये कृषि परिषदे अंतर्गत महाराष्ट्र कृषि विद्यापीठे सेवा प्रवेश मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. तसेच कृषि परिषदेत कृषि विद्यापीठांच्या कार्याचा आढावा घेणे, मूल्यमापन करणे, पर्यवेक्षण करणे आणि मार्गदर्शन करण्यासाठी शिक्षण, संशोधन, विस्तार शिक्षण या सोबतच साधन सामुग्री विकास विभाग, वित्त आणि प्रशासन विभाग करण्यात आले आहेत.

कृषि क्षेत्र सध्या अनेक नैसर्गिक व जागतिक आव्हानांना सामोरे जात असून भविष्यात शेतीच्या स्थैर्यासाठी संशोधन व शिक्षण या क्षेत्रात कालसुसंगत बदल करण्याची आवश्यकता आहे. देश पातळीवर भारतीय कृषि अनुसंधान परिषद कार्यरत असून शिक्षण, संशोधन व विस्तार शिक्षण यावर भरीव कार्य करीत आहे. राज्यात चार कृषि विद्यापीठे व एक पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ कार्यरत आहे. या सर्व विद्यापीठांना

त्यांचे कार्यक्षेत्रात कृषि शिक्षण, संशोधन व विस्तार शिक्षण असे कार्य अधोरेखित केले आहे. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेचे कार्य कालसुसंगत व परिणामकारक असावे म्हणून याविषयी एक अभ्यासगट नेमणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या कार्याचे पुर्नविलोकन करण्यासाठी अभ्यासगट गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या कार्याचे पुर्नविलोकन करण्यासाठी अभ्यासगट गठीत करण्यात येत असून त्याबाबतच्या समितीची रचना खालीलप्रमाणे:

**समितीची रचनाः-**

| अनु.क्र. | सदस्यांची नावे | पदनाम |
|---|---|---|
| १. | डॉ. आर.बी. देशमुख, माजी कुलगुरू, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी. | अध्यक्ष |
| २. | डॉ. उमाकांत दांगट, भा.प्र.से (से.नि.) माजी कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ३. | डॉ. पी.जी. पाटील, कुलगुरू, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी. | सदस्य |
| ४. | डॉ. इंद्रमणी, कुलगुरू, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी. | सदस्य |
| ५. | डॉ. शरद गडाख, कुलगुरू, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | सदस्य |
| ६. | डॉ. संजय सावंत, कुलगुरू, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ दापोली. | सदस्य |
| ७. | डॉ. सुदाम अडसुळ, माजी संचालक, कृषि , महाराष्ट्र राज्य. | सदस्य |
| ८. | डॉ. दिलीप अ. देशमुख, माजी उपमुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य. | सदस्य |
| ९. | महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परीषद, पुणे. | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीने खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून त्यांचा स्वयंस्पष्ट अहवाल विहीत कालावधीत शासनास सादर करावा.

अ. अहवाल तयार करण्यासाठी आवश्यक मनुष्यबळ चार कृषि विद्यापीठांपैकी कोणत्याही विद्यापीठाकडून तात्पुरत्या स्वरुपात उपलब्ध करुन घेण्याचे अधिकार समितीस असतील.

ब. समितीचे कामकाज सुरु झाल्यापासून शासनास अहवाल सादर होईपर्यंत होणारा आर्थिक खर्च चारही कृषि विद्यापीठांनी त्यांच्या महसूली उत्पन्नातून समसमान स्वरुपात विभागून घ्यावा व तो समितीचे सदस्य सचिव यांचेकडे जमा करावा.

क. समितीचे संपूर्ण प्रशासकीय व आर्थिक कामकाज सदस्य सचिव यांचेमार्फत करण्यात यावे.

ड. समितीने आपला अहवाल ४५ दिवसात कृषि परिषदेमार्फत शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०४२५२००१५७६९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने, UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.04.25 20:08:17 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
९. श्री.उमाकांत दांगट, भा.प्र.से (से.नि.) माजी कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
१०. डॉ. सुदाम अडसुळ, माजी संचालक (कृषि), महाराष्ट्र राज्य.
११. डॉ.पी.जी. पाटील, कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर,
१२. डॉ. शरद गडाख, कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
१३. डॉ. इंद्रमणी, कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
१४. डॉ. संजय सावंत, कुलगुरु, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
१५. डॉ. आर.बी. देशमुख, माजी कुलगुरू, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
१६. डॉ. दिलीप अ. देशमुख, देऊळगावबंडा, ता.रिसोड, जि.औरंगाबाद.
१७. निवडनस्ती ७-अे.